.

**एशियाटिक सोसायटी, मुंबई या संस्थेकडे असलेल्या दुर्मिळ ग्रंथ व हस्तलिखित यांचे डिजिटायझेशन करण्यासाठी निधी वितरीत करण्याबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक-पुरक-२०२२/प्र.क्र.८१/साशि-५,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १४ मार्च, २०२३.

**संदर्भ :** १) शासन निर्णय,उच्च व तंत्र शिक्षण विभाग,क्र.संकीर्ण-२०२१/प्र.क्र.१७/साशि-५, दि.०३.०६.२०२१
२) शासन निर्णय,उच्च व तंत्र शिक्षण विभाग,क्र.पुरक-२०२१/प्र.क्र.७८/साशि-५, दि.२०.०८.२०२१
३) शासन निर्णय,उच्च व तंत्र शिक्षण विभाग,समक्रमांक,दि.३०.०९.२०२२
४) ग्रंथालय संचालक, ग्रंथालय संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र.३४/एसोमुं/ २०२२-२३/१४८४६, दि.०८.०२.२०२३.
५) शासन परिपत्रक,वित्त विभाग, क्र.अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३,दि.०८.०२.२०२३.

**प्रस्तावना :**

एशियाटिक सोसायटी, मुंबई या संस्थेकडे असलेल्या दुर्मिळ ग्रंथ व हस्तलिखित यांचे डिजीटायजेशन करण्यासाठी रु.५,००,००,०००/- ( अक्षरी रुपये पाच कोटी फ़क्त ) निधी उपलब्ध करुन देण्यास संदर्भाधिन दि. ०३.०६.२०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. यानुषंगाने संदर्भाधिन दि. २०.०८.२०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये रु.१,००,००,०००/- ( अक्षरी रुपये एक कोटी फ़क्त ) व दि.३०.०९.२०२२ रोजीच्या शासन निर्णयान्वये रु.५०,००,०००/- ( अक्षरी रुपये पन्नास लाख फ़क्त ) इतका निधी वितरीत करण्यास मान्यता देण्यात आली आहे. आता, एशियाटिक सोसायटी, मुंबई या संस्थेकडे असलेल्या दुर्मिळ ग्रंथ व हस्तलिखित यांचे डिजीटायजेशन करण्यासाठी रु. २०,००,०००/- ( अक्षरी रुपये वीस लाख फ़क्त ) इतका निधी वितरीत करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :**

एशियाटिक सोसायटी, मुंबई या संस्थेकडे असलेल्या दुर्मिळ ग्रंथ व हस्तलिखित यांचे डिजीटायजेशन करण्यासाठी रु. २०,००,०००/- ( अक्षरी रुपये वीस लाख फ़क्त ) इतका निधी वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. उपरोक्त खर्च करताना वित्त विभागाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णय/परिपत्रकांतील सूचनांचे पालन करण्यात यावे.

३. सदर खर्च मागणी क्र. डब्ल्यु-४, २२०५-कला व संस्कृती, १०५, सार्वजनिक ग्रंथालये, (०३) मध्यवर्ती, जिल्हा व तालुका ग्रंथालयांना सहाय्य, (०३) (१०) एशियाटिक सोसायटी मुंबई ग्रंथालयाचा

सर्वांगीण विकास ( २२०५ ३४७५ ) ( कार्यक्रम ) ३१- सहायक अनुदाने वेतनेतर या लेखाशिर्षांतर्गत सन २०२२-२३ या आर्थिक वर्षात वितरीत निधीतून भागविण्यात यावा.

**४.** या रकमेची उपयोगिता प्रमाणपत्रे संबंधितांनी विहित मुदतीत सादर करणे आवश्यक राहील.

**५.** एशियाटिक सोसायटी, मुंबई या संस्थेने या योजने अंतर्गत केलेल्या कामाचा अहवाल ग्रंथालय संचालक, ग्रंथालय संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना सादर करावा. तसेच ग्रंथालय संचालक यांनी एशियाटिक सोसायटी, मुंबई या संस्थेने केलेल्या कामाचा आढावा घेऊन त्याबाबतचा अहवाल शासनास सादर करावा.

**६.** शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३,दि.०४.०४.२०२२ मधील सूचना/अटींची पुर्तता होत असून सदर शासन निर्णय वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र. २२५/व्यय-५, दि.२२.०२.२०२३ अन्वये प्राप्त सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

**७.** सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२३०३१४१२२०५११६०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

HEMANT SUDHAKAR PATHAK

Digitally signed by HEMANT SUDHAKAR PATHAK
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=1a58924bb1ebc2ed6699e048bfa42ad41d1ed32de1e3eda84d0c03040473905e,
pseudonym=F3A300993D1ECCDA0475B29D01BB9CCB72F6998C,
serialNumber=EE03447853A43CF2A3547CBC186E49802A70EF183CF488073E81785E6AD171A6, cn=HEMANT SUDHAKAR PATHAK
Date: 2023.03.14 12:24:54 +05'30'

**( हे.सु.पाठक )**
**अवर सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई
२. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव,मंत्रालय, मुंबई
३. मा. उपमुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा. मंत्री, उच्च व तंत्र शिक्षण विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५. अपर मुख्य सचिव, नियोजन/वित्त विभाग,मंत्रालय,मुंबई
६. प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग,मंत्रालय,मुंबई
७. महालेखापाल-१ (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई
८. अध्यक्ष, एशियाटिक सोसायटी, नगर भवन, मुंबई. ( ग्रंथालय संचालनालयामार्फ़त )
९. ग्रंथालय संचालक, ग्रंथालय संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१०. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
११. निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
१२. अवर सचिव ( साशि-१ ), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. निवडनस्ती (साशि-५), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय,मुंबई.